राज्य शासनामार्फत चालविण्यात येत असलेल्या आहार/उपाहारगृहामार्फत खान-पान सेवा पुरवितांना अतिरिक्त रक्कम आकारणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग (उपाहारगृहे)**
**शासन निर्णय क्रमांक आस्था-२०१६/प्र.क्र.३२०/१६/मंउका,**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक- ६ जुन, २०१७

**संदर्भ-**शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग (उपाहारगृहे) समक्रमांक, दिनांक २६/०५/२०१७

**प्रस्तावना :**

सामान्य प्रशासन विभागाच्या अधिपत्याखाली चालविण्यात येणाऱ्या मंत्रालय उपाहारगृह, चौरस आहारगृह, विधानभवन उपाहारगृह व कोकणभवन उपाहारगृहातील खाद्यपदार्थांच्या पुनर्विलोकन समितीने निश्चित केलेले विक्री दरास संदर्भाधीन दिनांक २६/५/२०१७ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. त्याचप्रमाणे पुनर्विलोकन समितीने सहमती दर्शविल्यानुसार उपाहारगृहातील राजपत्रित अधिकारी कक्षात तसेच अधिकाऱ्यांच्या दालनात खानपान सेवा पुरवितांना खाद्यपदार्थांच्या निश्चित केलेल्या विक्री दरापेक्षा अधिक रक्कम आकारण्यास मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :**

सामान्य प्रशासन विभागाच्या अधिपत्याखालील मंत्रालय उपाहारगृह, चौरस आहारगृह, विधानभवन उपाहारगृह व कोकणभवन उपाहारगृहामध्ये विक्रीसाठी ठेवण्यात येणाऱ्या खाद्यपदार्थ, भोजनथाळी व पेय पदार्थ इत्यादीचे विक्री दर संदर्भाधीन दिनांक २६/५/२०१७ च्या शासन निर्णयानुसार निश्चित करण्यात आले आहेत. त्याचप्रमाणे खाद्यपदार्थाचे दर निश्चित करताना झालेल्या बैठकीत पुनर्विलोकन समितीने मान्य केल्यानुसार उपाहारगृहामार्फत पुरविण्यात येणाऱ्या खानपान सेवेसाठी खालीलप्रमाणे अतिरिक्त रक्कम आकारण्यास मान्यता देण्यात येत आहे.

अ) उपाहारगृहातील राजपत्रित अधिकारी कक्षामध्ये खान-पान सेवा पुरवितांना, वरिष्ठ अधिकाऱ्यांच्या बैठकांना तसेच अधिकाऱ्यांच्या दालनात खानपान सेवा पुरवितांना पदार्थांचे निश्चित विक्री दरापेक्षा रुपये १/- प्रति पदार्थ इतकी अधिक रक्कम आकारली जाईल.

ब) मंत्रालय उपाहारगृहामार्फत मा.मंत्रीमंडळाच्या बैठकीकरीता तसेच मा.मुख्यमंत्री, मा.मुख्य सचिव यांच्या हायटी च्या बैठकीकरीता तसेच वरीष्ठ अधिकारी यांनी त्यांचेकडील बैठकाकरीता उपाहारगृहात तयार करण्यात येणाऱ्या पदार्थाव्यतिरिक्त बाहेरील खाद्यपदार्थांची मागणी नोंदविल्यानुसार असे खाद्यपदार्थ संबंधितांना उपलब्ध करुन देण्यासाठी येणाऱ्या खर्चाची प्रतिपूर्ती होण्यासाठी मागणी केलेल्या खाद्यपदार्थांच्या किंमतीवर २० टक्के इतका अतिरिक्त अधिभार आकारण्यात येईल.

क) संदर्भाधीन दिनांक २६/५/२०१७ च्या शासन निर्णयासोबतच्या विवरणपत्रात नमूद केलेल्या पदार्थाव्यतिरिक्त पदार्थ तसेच विशेष (Special) पदार्थ पुरविताना साधारणपणे तो पदार्थ तयार करण्यासाठी होणाऱ्या प्रत्यक्ष खर्चाइतकी रक्कम विक्रीदर म्हणून सहसचिव/उपसचिव (उपाहारगृहे) यांच्या मान्यतेने निश्चित करण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०६०६१५५७३५८५०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dadasaheb Sopan khatal

Digitally signed by Dadasaheb Sopan khatal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a310d57c42fb870fa7e7090329a6f40b05dc84ae61a81ed6b863484754bf19f1, cn=Dadasaheb Sopan khatal
Date: 2017.06.06 15:57:49 +05'30'

**(दा.सो.खताळ)**
**महाव्यवस्थापक**
**मंत्रालय उपाहारगृहे**

**प्रति,**

१) मा.मुख्यमंत्र्यांचे अपर मुख्य सचिव
२) मा.मंत्री/मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
३) प्रधान सचिव, विधानमंडळ सचिवालय, मुंबई
४) अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव/सहसचिव, सर्व मंत्रालयीन विभाग यांचे स्वीय सहायक
५) सर्व मंत्रालयीन विभाग/नवीन प्रशासकीय भवनातील सर्व कार्यालये,
६) वित्त विभाग, व्यय-४/प्रशासन-८, मंत्रालय, मुंबई
७) महालेखाकार-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई,
८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
९) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१०) सहाय्यक आयुक्त, मुंबई विभाग, कोकण भवन, बेलापूर, नवी मुंबई
११) व्यवस्थापक, मंत्रालय उपाहारगृह, विधानभवन उपाहारगृह व कोकणभवन उपाहारगृह
१२) उपव्यवस्थापक, चौरस आहारगृह,
१३) सहायक लेखा अधिकारी, मंत्रालय उपाहारगृहे कार्यालय
१४) सहायक लेखा परीक्षा अधिकारी, मंत्रालय उपाहारगृहे कार्यालय
१५) निवडनस्ती